नवनाथ भक्तिसार    अध्याय  आठवा

मच्छिंद्रनाथ कोकण प्रांतात भ्रमंती करीत असतां शिवपुत्र वीरभद्र मानवी अवतारात (मानावदेही) त्यांच्या संपर्कात आले आणि अत्यंत शुल्लक कारणावरून नाथांची अस्मिता दुखावली गेली. त्यांची गुरुनिष्ठा आणि गुरुभक्ती पराकोटीची होती वीरभद्राने केलेली गुरुनिंदा त्यांना सहन झाली नाही आणि वीरभद्राचे आव्हान त्यांनी स्वीकारले. त्या दोघांमध्ये तुंबळ रणकंदन झाले आणि परिणामी चराचर सृष्ठी भयकंपीत झाली. अवघे भूमंडळ डळमळले आणि हा संग्राम थांबवा यासाठी ब्रह्मा, विष्णू आणि महेश यांच्यासहित सर्व देव प्रकट होऊन या दोघांमध्ये आडवे उभे राहिले, त्यांनी मच्छिंद्रनाथांची स्तुती करून वीरभद्रालाही शांत केलेच नाही तर त्या दोघांत सख्यही घडवून आणले. मच्छिंद्रनाथांचा तेजस्वी पराक्रम पाहून वीरभद्राने, “तुझ्यासारखा युद्धनिपुण शिष्याचे गुरु धन्य असुन त्यांना मी आदराने वंदान करीत आहे.” अशी स्तुती केलीच शिवाय नाथांनी अंगीकारल्या मानवी कल्याणाच्या, जगत् कल्याणाच्या कार्यात सहकार्यसुद्धा करीन असे निःसंदिग्ध आश्वासनही दिले. देवाधीदेवाच्या सहवासात वैकुंठ, कैलास आणि अमरावती येथे मच्छिंद्रनाथांनी पाहुणचार स्वीकारला आणि प्रभूरामाच्या वास्तव्याने पावन झालेल्या शरयू निदीच्या तीरावरील आयोध्यानगरीत तीर्थाटनासाठी निघाले.

श्रीरामाच्या अवतार समाप्तीनंतर त्यांच्या जन्मभूमीवर मंदिर उभारून त्यांत कोदंडधारी श्रीरामासह सीतामाई आणि भाऊ लक्ष्मण यांच्या संगमरवरी देखण्या मुर्त्या स्थापन करण्यात आल्या होत्या. एकवचनी, एक पत्नी, मर्यादा पुरषोत्तम, सुर्यावंशात जन्मलेल्या प्रभू रामचंद्राची अयोध्यानगरी आणि त्या नागरीच्या आसपास विखुरलेल्या पुरातन अवशेषाच्या खाणाखुणा रामराज्याच्या दैदिप्यमान भूतकाळाची साक्ष देत होत्या. अशा या पावन तीर्थक्षेत्राच्या दर्शनासाठी नाथ आले होते. शरयू नदीत स्नान करून ते प्रभूरामाच्या दर्शनासाठी मंदिराकडे निघाले.

योगायोगाने दैववशात त्याच वेळी रामवंशातील राज्यकर्ता अयोध्यापती महाराज पाशुपत मंदिरात पूजा विधीसाठी आला असल्याने त्या परिसरात घोडदळ, पायदळ, गजदळ यांचा गराडा पडला होता. कडेकोट बंदोबस्तात राजाचा पूजा विधी होत होता. भूप अंबारी, छत्रचामरे यांचे कळस सूर्यप्रकाशात लखलखत होते. अश्वांच्या कंठात सुवर्णकोंदणात मढवलेल्या रत्नमाला, पाठीवर रेशमी वस्त्रांच्या झुली, त्यावर कसलेली खोगीरासने, अश्वांच्या पदांमध्ये छमछमणारी नुपूर पैंजणे, अश्वमाथ्यावरील दिमाखदार तुरा अशी आरास केलेल्या घोड्यांवर मर्दानी मांड ठोकून विराजमान झालेले तगडे सैनिक पाहताच उरांत धडकीच भरली पाहिजे, वायूपेक्षाही अधिक वेगाने दौडण्याचे कसब त्यांच्यात आहे आणि ते पांढरे शुभ्र अश्व पाहतांना क्षणभर वाटे की सागररुपी शिंपल्यातून चंद्रबंधू अवतरले आहेत.

अशाच कलात्मकतेने गजदलातील महाकाय गजराज नटून थटून डौलाने झुलत होते. विशाल शोभिवंत गंडस्थळ, अणकुचीदार सुवर्णजडीत हस्तीदंत, पाठीवरील नक्षीदार झुलींवर हौदे आणि अंबाऱ्या सजविण्यात आल्या होत्या. ते महाकाय गजराज पर्वताप्रमाणे विशाल वाटत होते. पर्वतावरील वृक्षराजी जशी वाऱ्याच्या झोतामुळे विहरत असते तसे दृश्य हिंदुधर्माचे विजयी भगवे ध्वज अंबाऱ्यांवर डौलाने फडकताना भासमान होत होते. पायदळात असंख्य वीर सैनिक होते. भालदार चादार, छडीदार, जासूद, हळकारे, हुजरे, बारगीर ईत्यादी असंख्य पादाती, कंठात रत्नजडीत सुवर्णमाला, सुवर्णलंकार, हस्तांगुल्यांमध्ये सुवर्णमुद्रिका, उंची वस्त्रांचा गणवेश, करडी नजर रोखून पहारे देत होते. पराक्रमी राजाच्या पराक्रमी सेनेने मंदिराला सैन्य छावणीचे स्वरूप आले होते.

प्रभूदर्शनासाठी मच्छिंद्रनाथ मंदिरात जात असताना मात्र एक विपरीत घडले. द्वारपालांनी त्यांची बरबोटी धरली आणि धक्के मारीत बाहेर नेले. नाथांचा संताप झाला पण त्यांनी रागाला आवरले. त्यांच्या मनात विचार आला की पापाचरण करणारा मानवच द्वारपाल होत असावा. तो धर्माचा काळ होऊन अधर्माने वागतो. त्याचे वागणे पिसालेल्या श्वानासारखे असते. ते स्वतः पापाचे धनी होतात. त्यांच्याबरोबर यजमानांनाही ते पापात लोटतात. सज्जन दुर्जन, लहान मोठा यातील भेद लक्षात ना घेता ते दिसेल त्याच्यावर कठोर वाचेने, निष्ठुरपणे धावत असतात. येथील द्वारपालही तसेच होते. मच्छिंद्रांना धक्के मारीत बाहेर काढताना ते ओरडत होते, "अरे मुर्खा, कानफाड्या जोगड्या! लगबगीने कुठे निघालास? चल मागे हो!! महाराज दर्शासाठी मंदिरात आले आहेत हे तुला उमजत नाही? मतीमंद, मूर्ख! चल चालता हो येथून."

राममंदिराच्या द्वारपालांकडून मच्छिंद्राची उपेक्षाच झाली. त्यांच्या कठोर वक्तव्यांनी आणि निर्दयपणे मारलेल्या धक्क्यांनी नाथांना संताप आला होता. तरीही त्यांनी संयम राखून विचार केला की या सेवकांवर क्रोध करणे योग्य नाही ते हुकुमाचे बांधील आहेत. पतिव्रता स्त्री पतीच्या आज्ञेत असते, किंवा पात्राच्या मार्यादेतूनच नदीला व्हावे लागते, त्याचप्रमाणे त्यांना राजाज्ञेची अंमलबजावणी करणे हे त्यांचे कर्तव्य आहे. ज्याप्रमाणे सुई मागे धागा असणारच किंवा सुर्यामागे किरणांचे आगमन होणारच. त्याचप्रमाणे राजाबरोबर सेवक हे असणारच. ते त्यांचे कर्तव्य करीत आहेत त्यामुळे त्यांना दोषी धरता येत नाही. तरीही सेवा करण्याची ही पद्धत अयोग्य आहे पण राजाचेच जर त्यांना अशिष्ट वागण्यासाठी प्रोत्साहन असेल तर आपण राजालाच शिक्षा करावी तथापि नाथांच्या मनात विकल्प निर्माण झाला की राजाला काही अपाय करावा, तर तो लाखोंचा पोशिंदा आहे. त्याला अपाय केला तर प्रजेवर दुःखाचा डोंगर कोसळेल. सूर्यच झाकला गेला तर सर्वत्र अंधार पडेल. त्यामुळे प्रजाहित लक्षात घेता राजालाही कठोर शिक्षा करून चालणार नाही.

असा सारासार विचार करून नाथांनी भस्म चीमुटी काढून स्पर्शास्त्र जपले. इकडे मंदिरात महाराज पाशुपत प्रभूरामाच्या मूर्तीसमोर जमिनीवर साष्टांग नमस्कार करीत होता. नाथांनी राजाच्या नावाने स्पर्शास्त्र सोडताच, राजा तसाच उपड्या अवस्थेत जमीनवर चिकटला, त्याला उठता येईना, पुष्कळ प्रयत्न केले पण काही उपाय चालेना. शेवटी महामंतरी आणि सैनिकांना उद्देशून राजा म्हणाला, "काय चमत्कार आहे हा? धरतीनेच चिकटवून ठेवले आहे, उठता येत नाही. काही तरी उपाय योजा!" राजाचे नेक महामंत्री, ज्ञानी आणि सत् प्रवृत्त होता. हा चमत्कार असल्याचे त्याने जाणले. मनात विचार करू लागला की एखादा सिध्द योगी नगरीत आला असावा आणि राजसेवकांनी त्याला उपद्रव दिला असावा त्यामुळे कोपित होऊन त्याने ही लीला दाखवली असावी.

भक्तांचा छळ झाल्यास भगवंताला सुद्धा अनावर राग येतो. दुर्वास ऋषींनी कारण नसताना श्री अंबऋषीं चा छळ केला असता, भगवंतानी अवतार धारण केले होते. भक्त प्रल्हादाला गांजल्याचा क्रोध येऊन स्वयं श्री विष्णू नरसिंह रुपात प्रकटले होते. यज्ञकुंडात पडलेल्या बेडकाच्या पिल्लावर शितोद्काचा वर्षाव करून भगवंताने रक्षण केले, अशी अनंत उदाहरणांची साक्ष आहे. सदभक्ताच्या रक्षणांसाठी तो सदैव तत्पर असतो. अरण्यात वादळाच्या कडकडाटाने घाबरून प्राणभयाने पक्ष्यांची जोडी पिल्लांना टाकून उडून गेली. तेव्हा स्वतः भगवंताने हत्तीच्या गळयातील घंटा त्यांच्यावर ठेवून छत्र निर्माण केले. विशाल सर्परूप धारण करून शिकाऱ्यांपासून पक्षांचे संरक्षण केले. पाण्यात उतरलेल्या गजेंद्राचा पाय मगरीने धरून ठेवला असता भगवंत सुदर्शन चक्र घेऊन मदतीसाठी धावला होता. याचप्रकारे कोणातरी साधुपुरुषाला आपल्याच राजसेवकांनी त्रास दिला असल्याची शक्यता विचारात घेऊन महामंत्री बाहेर येऊन द्वारपालाकडे

चौकशी करता करता महाद्वारावर झालेली बाचाबाची आणि पहारेकऱ्यांकडून मच्छिंद्रांची घोर उपेक्षा झाल्याची हकीगत महामंत्र्यांना समजली, त्या समंजस महामंत्र्याने मच्छिंद्रनाथांना शोधून काढले आणि त्यांच्या पायांवर लोटांगण घालून विनविले, "योगी महाराज!! आम्हांकडून अज्ञानवश काही अपराध घडला असेल तर क्षमा करावी. आपण साधूसंत महत्म्ये आहात. आम्हांवर कृपा करावी. या सृष्टीवर पर्जन्याचा वर्षाव करणाऱ्या मेघांपेक्षाही संत श्रेष्ठ आहेत. कारण जलवर्षावनंतर मेघ रिक्त होतात. परंतु संताचे दयाभांडार कधीच रिक्त होत नाही आपणांसारखे साधू महात्मे परिसापेक्षाही श्रेष्ठ आहात. कारण परीस फक्त लोखंडाचेच सोने करतो पण तुमच्याकडे मात्र हा भेदाभेद नाही, तुम्ही सर्व प्राणीमात्रांवर सारखेच प्रेम करता. तुम्हाला कल्पवृक्ष म्हणून संबोधणेही गैर आहे कारण कल्पवृक्ष शुभ अशुभ रत्न दाखवतो पण तुम्ही सदैव शुभ चिन्हेच भूषवता. तेव्हां हे दयाळा! कृपाळा! आम्हाला क्षमा करावी.

महामंत्र्याच्या नम्रतेने आणि त्यांनी कळकळीने केलेल्या स्वामीमुक्तीच्या आव्हानामुळे, प्रार्थनेमुळे मच्छिंद्रनाथ प्रसन्न झाले. त्यांनी भस्माची चिमुट घेऊन विभाक्तास्त्रास आव्हान केले. मंदिरात चमत्कारच झाला. महाराज क्षणार्धात उठून बसले. त्यांनी महामंत्र्यांना हे वृत्त त्वरेने कळविले. महामंत्र्याने अत्यंत सन्मानाने नाथांना प्रभू रामचंद्राच्या मंदिरातील राजासमीप आणले. सर्व वृतांत ऐकून राजानेही नाथांच्या चरणांवर अत्यंत भक्तिभावाने माथा टेकविला आणि हात जोडून विचारले, "योगीराज! आपला परिचय द्यावा!!"

नाथ म्हणाले, "हे राजा! मी मच्छिंद्रनाथ, कानफाडी नाथपंथीय जोगी आहे." या उत्तराने अयोध्यापती पाशुपत महाराज थक्कच झाले. ज्यांच्या पराक्रमाच्या अनेक आख्यायिका आपण यापूर्वी ऐकल्या आहेत, तोच मच्छिंद्रनाथ साक्षात समोर उभा पाहून राजा पुन्हा पुन्हा पाया पडू लागला. भेटीची इच्छा फलद्रूप झाली होती. राजाने नाथांना आपल्या राजमहलात नेऊन स्वतःच्या सुवर्णसिंहासनावर बसविले. षोडशोपचारे पूजन केले. तन मन धन अर्पून भक्ती केली. राजमहाली वास्तव्यात पाशुपत महाराज सातत्याने आसनी, शयनी, भोजनी, गमनी सर्वत्र मच्छिंद्रनाथांसमवेत हात जोडून सेवेसाठी तत्पर असत. अशा प्रकारची श्रद्धा पाहून नाथ प्रसन्न होऊन म्हणाले, "नरेशा! तुझी काही मनोकामना असेल तर सांग?" त्यावर अयोध्या नृपाळ म्हणाला, "योगी नाथ! मी सुर्यवंशातील रामकुळोत्पन्न पाशुपत नावाचा भूपती आहे. तरीही मला प्रभू रामाचे दर्शन घडल्यास मी स्वतःला भाग्यवान समजेन"

"अवश्य!" म्हणून मच्छिंद्रनाथ उठले राजमहलाच्या बाहेरील अंगणात उभे राहून धुम्रास्त्र मंत्रून सूर्यावर सोडले त्यामुळे नाभांगणीचा सुर्यमार्ग ढग धुराने भरून गेला. स्वतः सुर्यासह सारथी अरुण आणि रथाच्या अश्वांनाही त्याचा त्रास जाणवू लागला. त्यांच्या डोळयांत आणि नाकातोंडात धूर जाऊन प्राण कंठाशी आले सूर्याने धनुष्यावर वायुबाण चढवून सोडल्याने सोसाट्याचा वारा प्रकट होऊन धुराचे निवारण केले पण धूराला पळविण्यासाठी वायुवेगाने धरणीवर झंझावात निर्माण झाला. धरणीवरील वृक्ष मुळांसकट उखडून पडले. निसर्गसृष्टीचा भयावह नुकसान होऊ लागले. नाथांनी पर्वतास्त्र मंत्रून वायूमार्गात उंच उंच पर्वतांचा अडसर उभा करून त्या झंझावातांना शांत केले. परंतु ह्या महाकाय पर्वतांच्या उंच उंच शिखरांमुळे आकाशात सूर्य रथाला अडथला निर्माण होऊन रथ चालेनासा झाला. सूर्यदेवाने रथमार्ग निर्विघ्न करण्यासाठी वज्रास्त्र टाकून पर्वतांचे चूर्ण केले. नाथांनी भ्रमी अस्त्र सोडताच त्या सप्तअश्वाच्यांच्या रथाचे सारथ्य करणारा अरुण भ्रमिष्ठपणा करू लागला, रथ भलतीकडेच उधळू लागले. तेव्हा सूर्याने ज्ञानरूप ईश्वराचे स्तवन करून त्याचा भ्रम दूर केला. रथ पुन्ह मूळ मार्गाने धावू लागल्याने अनर्थ टळला. हे पाहून मच्छिंद्रनाथांनी वाताकर्षण अस्त्र टाकताच सूर्य, अरुण आणि आशवांचे श्वास कोंडले गेले. तसेच रथाला खालून आधार देणारा वायू नष्ट झाल्याने

रथ धरणीवर उलटून पडला. साक्षात सूर्यदेव दिव्यरथासह मूळ स्वरूपात धरणीवर पडताच त्यांच्या दाहक उष्णतेमुळे निसर्गसृष्टीला, भूमीला ग्रासले. नाथांनी निसर्ग रक्षणासाठी तात्काळ जलदास्त्र सोडून पर्जन्याचा वर्षाव सुरु केल्यामुळे अग्नी शांत झाला. प्रत्यक्ष सूर्यनारायणच भूमीवर गलितगात्र होऊन पडल्याने दिवसरात्रीचे गतीचक्र थांबून सुष्टीचक्रावरच त्याचा परिणाम भयावह होणार आहे, या जाणीवेने सर्व देव चिंता मग्न झाले, ब्रह्मा, विष्णू, महेश, वरूण, अश्विनी, कुबेर, सूरवर, गंधर्व, सत्यलोक तपोलोकातीलदेव, अतळ वितळ सुतळ आदी सप्तपाताळातील देव सर्वजण झाडावर पक्षी उतरावे तसे नाथांजवळ उतरले. श्रीविश्णुदेवांनी नाथांना आलींघन देत विचारले, "कवी नारायणा! ह्या जगतमित्र सूर्यनारायणाला तू का धरणीवर पडला आहेस?"

मच्छिंद्रनाथांनी श्रीविष्णूला नमस्कार केला आणि म्हणाले, "भगवंता! हा पाशुपत राजा सुर्यकुळातील असून सुद्धा सूर्य आपल्या वंशजांकडे लक्ष देत नाही. आपल्या पितृधर्माला जागत नाही. कुलस्वामी असूनही सूर्याने कुलदीपकावर मायेची पखरण घातली नसल्याने त्याला जाणीव करून देण्यसाठी असे करणे मला भाग पडले आहे. याशिवाय माझ्या शाबरी मंत्रकाव्यातील सूर्यमंत्राप्रमाणे वागून सूर्याने कार्यसिध्द करावे. तसेच सुर्यवंशातील विजयध्वज प्रभूरामाची आणि या पाशुपताची आज येथे भेट घडवून आणावी कारण तसे पाशुपताला वचन देऊन मी वचनात गुंतलो आहे..."

ते ऐकून वैकुंठपती श्रीविष्णू म्हणाले, "तुझ्या सर्व मनोकामना पूर्ण होतील. तुझ्या शाबरी काव्यातील सूर्यमंत्र जगात प्रसिद्ध पावून प्रभावीपणे कार्य करतील. स्वतः सूर्यनारायण ते कार्य पूर्णत्वास नेतील. तुझे लोकोपकारी सूर्यमंत्र पठण करताच किंवा सहज सूर्याचे नामस्मरण केले तरी सर्व पातके नष्ट होतील. आम्ही सर्व देवदेवतांसुद्धा तुझे कार्य पार पाडण्यासाठी सूर्यदेवांना सहाय्य करू. या कामी कुणीही कुचराई करणार नाही, असे आम्ही सर्वजण वाचन देत आहोत. नागपत्र अश्वत्थ वृक्षांवर आणि वीरभद्र समरप्रसंगी आम्ही तुला वरदान देलेले आहेच. आता विलंब न करता सूर्यनारायणाला सावध करावे..."

यावर मच्छिंद्रनाथ नम्रतेने म्हणाले, "आधी पाशुपताला श्रीराम दर्शन घडवून मी त्याला दिलेल्या वचनातून माझी सोडवणूक करा म्हणजे मला ही समाधान प्राप्त होईल."

नाथांचे बोलणे संपण्यापूर्वीच कोदंडपाणी दशरथतनय श्रीराम, बंधू लक्ष्मणासह प्रकट झाले. प्रभू रामांनी नाथांना प्रेमाने कवेत घेतले, नाथ हात जोडून नम्रतेने म्हणले, "हे प्रभो! राधोत्मा, तुझी अनंत नावे असूनही त्यात 'सीतापती' सर्व श्रेष्ठ आहे. तुझे प्रत्येक नाव शुभ आहे. ते माझ्या मुखात विराजमान व्हावे. तसेच माझ्या शाबरी काव्यात जेथे जेथे तुझे नाव येईल ते कार्य करण्याची कुपा करावी. तसं वरदान मला द्यावे. जर वर देण्याचे मनाला पटत नसेल तर, कोदंडबाण सज्ज कर आपण रणांगणावर त्याचा निर्णय लावू.."

मच्छिंद्रनाथांची वीरश्रीयुक्त वाणी ऐकून, प्रभू रामचंद्र प्रसन्न मुद्रेने म्हणाले, "मच्छिंद्रा!! तुझ्यावर तिन्ही देवांचा एक अवतार असणाऱ्या श्री दत्तात्रेयांचा आशीर्वाद आहे. अन्य देवही तुझ्यावर प्रसन्न आहेत, मग मीच तुला सहकार्य करणार नाही असे शक्य आहे काय? त्याशिवाय मुळातच तुझा संकल्प हा लोकोपयोगी, मानवीकल्याणाच्या, जगतकल्याणाच्या कार्यसाठी अग्रणी आहे. तू ज्या मंत्रकाव्यात माझे स्मरण करशील ते काम मी करीन. बावन्न बिरात सबळ पराक्रम मी करीन आपण दोघेही श्रीविष्णूचे अवतार असल्याने आपण लौकिकार्थाने एकच आहोत आता त्वरेने

सूर्याला सावध कर. सूर्यवाचून धरणीवर हाहाकार झाला आहे. अंधार पडून जगाचा व्यवहार खोळंबला आहे. तसेच सूर्य हा माझा पूर्वज आहे. त्यासाठी तरी त्याची मुक्तता कर.”

श्रीरामाच्या मधुरबोलांनी प्रसन्न होऊन नाथांनी वातप्रेरक अस्त्र सोडून सूर्यदेवाला सावध केले. उठून बसताच सभोवार न्याहाळताना सर्व देव प्रकट झाल्याचे सूर्यांनी पहिले. सर्व देवांनी त्यांना वंदन केले. त्यांनीही सर्व देवांना नमस्कार केला. सूर्यदेवाने श्रीविष्णूला विचारले, “वैकुंठनाथ! मला जिंकून घेणारा कोण वीर क्षत्रिय योद्धा आहे, त्या पराक्रमी वीराला भेटू इच्छितो. मी त्याच्यावर युगानुयुगे प्रसन्न होऊन राहीन त्याची आणि माझी भेट त्वरेने घडवा.

देवांनी मच्छिंद्रनाथांना सूर्यदेवांच्या दर्शनासाठी बोलाविले. तेव्हा नाथांनी चंद्रास्त्र जपून स्वतःभोवती शितलपणाचे आवरण तयार केले. तसेच जलदास्त्राने सभोवती थंडगार पाणी पडत राहील अशी उपाययोजना करून सूर्याच्या दहाकतेवर मात करून, जवळ जाऊन सूर्यदर्शन घेतले. त्यानंतर श्रीविष्णूंनी नाथांची संपूर्ण अवतारकथा सूर्यदेवांना ऐकवून वास्तव ओळख करून दिली. त्यावर सुर्यनारायण म्हणाले, “तू धन्य आहेस मच्छिंद्र!! सतयुग, त्रेतायुग, द्वापारयुग गेले तरी असा थोर पराक्रम कुणी केला नाही. तू आणि तुझा प्रज्ञावंत गुरु, दोघेही धन्य आहात.”

नाथ हात जोडून भक्तिभावाने म्हणाले, “सूर्यदेवा!! माझ्या शाबरी मंत्रकाव्याला वरदान द्यावे. मंत्रप्रयोग होताच आपण प्रकट होऊन कार्य करावे. मानवकल्याणासाठी एवढी तसदी घावी महाराज!! सूर्यदेव म्हणाले, “अवश्य! तथास्तु!” त्यानंतर नाथांनी पाशुपताला सूर्यदर्शन घडविले. सूर्यदेवांना पाशुपताची वंशमालिका सांगून संतुष्ट केले. सर्वांनी राजाला आशीर्वाद दिले. सूर्यदेवाने वातचक्राला चालना देऊन रथ सिध्द करताच, सारथ्य करणाऱ्या अरुणाने सात अश्वांना गती देताच सूर्यरथ आकाशमार्गे प्रवास करू लागला. हे पाहून सर्व देव समाधानाने आपआपल्या स्थानी परतले. मच्छिंद्रनाथही पाशुपत राजाचा निरोप घेऊन वंगदेशाकडे निघाले.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठाणाने दूरदेशी गेलेला आपला मित्र / आप्त येऊन भेटेल.